NICSI च्या पॅनलवरील KPMG या व्यावसायिक संस्थेस मुदतवाढ देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३**
**मंत्रालय, मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,**
**मुंबई- ४०००३२.**
**दिनांक :- २८ डिसेंबर, २०२१**

वाचा - १. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि. २८.०३.२०१९.
२. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि.०४.०४.२०१९.
३. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि.०९.१०.२०१९.
४. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि.०२.०१.२०२०.
५. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण- २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि.११.०८.२०२०.
६. शासन निर्णय क्रमांक :- संकीर्ण - २०१७/प्र.क्र.७५३/१७/३३, दि.२५.०२.२०२१

**शासन निर्णय :-**

सन २०१९ मध्ये महाराष्ट्रात लोकसभा व विधानसभा या दोन्हींसाठी निवडणूक होणे अपेक्षित असल्यामुळे मतदारांचा सहभाग वाढावा याकरिता स्वीप (SVEEP) अंतर्गत हाती घेणाऱ्या कार्यक्रमांची प्रभावी अंमलबजावणी व्हावी तसेच त्यासाठीचा आराखडा तयार करणे, अभिलेख तयार करणे इ. कामांसाठी व्यावसायिक व तज्ञ स्वरुपाच्या मनुष्यबळाची नियुक्ती करण्यात यावी, या हेतुने दि.२८.०३.२०१८ च्या शासन निर्णयान्वये प्रथम दिनांक ०५.०४.२०१८ ते दि.०६.०४.२०१९ या कालावधीसाठी NICSI च्या पॅनेलवरील M/s KPMG या संस्थेची नियुक्ती करण्यात आली होती. त्यानंतर M/s KPMG यासंस्थेला दि.०४.०४.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.०७.०४.२०१९ ते दि.१५.०६.२०१९ पर्यंत, दिनांक ०९.१०.२०१९ च्या शासन निर्णयान्वये दि.१६.०६.२०१९ ते दि.१५.१२.२०१९ पर्यंत, दि.०२.०१.२०२० च्या शासन निर्णयान्वये दि.१६.१२.२०१९ ते दि.१५.०६.२०२० पर्यंत, दि.११.०८.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.१६.०६.२०२० ते दि.१५.१२.२०२० पर्यंत व दि. २५.०२.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये दि.१६.१२.२०२१ ते दि.१५.१२.२०२२ पर्यंत मुदत वाढ देण्यात आलेली आहे.

२. सदर M/s KPMG या संस्थेची मुदत दि.१५.१२.२०२१ रोजी मुदत संपलेली आहे. तथापी, M/s KPMG या संस्थेकडून पूरविलेल्या मनुष्यबळास या कार्यालयाने स्वतंत्र प्रशिक्षण दिले आहे. SVEEP कार्यक्रमांतर्गत हाती घेण्यात येणाऱ्या कार्यक्रमांचे प्रभावी अंमलबजावणी व्हावी, तसेच त्यासाठी आराखडा तयार करणे, अभिलेख तयार करणे, आयोगास अभिप्रेत असलेले अहवाल तयार करणे, याव्यतिरिक्त M/s KPMG या संस्थेस सोपविण्यात आलेले नवीन काम निवडणूकीशी संबंधित अधिकारी / कर्मचारी यांना ऑनलाईन प्रशिक्षण देण्यासाठी e-Learning Management System (e-LMS) व आयोगाच्या निर्देशांनुसार पहिल्या, दुसऱ्या व तिसऱ्या मजल्यांवरील मतदान केंद्रे तळ मजल्यावर

आणण्यासाठी Portable Polling Station संदर्भातील कामकाज करण्यासाठी M/s KPMG या संस्थेला दि.१६.१२.२०२१ ते दि.१५.१२.२०२२ या कालावधीसाठी पूर्वलक्षी प्रभावाने मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. याकरिता होणारा खर्च "२०१५-निवडणूक अंतर्गत १०३-मतदार याद्या तयार करणे व त्यांचे मुद्रण, (००) (०१) मतदार याद्या तयार करणे व त्यांचे मुद्रण १० - कंत्राटी सेवा, संकेतांक २०१५००३२" या लेखाशिर्षाखालील तरतूदीमधून भागविण्यात येईल.

४. हा शासन निर्णय प्रकल्प अंमलबजावणी समितीने दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्रमांक २०२११२२८१६१११८७५०७ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

ANIL NANSING VALVI

Digitally signed by ANIL NANSING VALVI
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=1a7c28200f6d58206324d8086ffcf99758c115aada508a7437f2ae5d9fa1ba5d, pseudonym=20AD9EDF1405CFBF390F3161A54475BDEE74D860, serialNumber=328A78FB26991EF7B9493EA647F585C65B1CF01913AE44B41FFEE5CC8464F2F1, cn=ANIL NANSING VALVI
Date: 2021.12.28 16:12:17 +05'30'

**( अ.ना. वळवी )**
**उप सचिव तथा सह मुख्य निवडणूक अधिकारी,**
**महाराष्ट्र राज्य**

**प्रत,**

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा व परिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
४. निवासी लेखा अधिकारी, मुंबई.
५. वित्त विभाग, व्यय-४, मंत्रालय, मुंबई.
६. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/कार्या-२६, मंत्रालय, मुंबई
७. कार्यासन- ३३, अर्थसंकल्प शाखा, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. निवडनस्ती.